ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पाचे कोर विभागांतर्गत पुर्नरचना करण्यात येणा-या नविन वनपरिक्षेत्र अधिकारी, कोलारा व वनपरिक्षेत्र अधिकारी, कारवा या पदांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफडीएम २०२०/प्र.क्र.२९/फ-२
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ८ ऑक्टोबर २०२०

संदर्भ :- १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा-प्र.५ दि. ०४.०१.२००६.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख) यांचे आदेश क्र. कक्ष ७(१)/आस्था-१ /प्र.क्र.५७/७००/१९-२० दि. २५.०२.२०२०
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.१७/(१९-२०)/५६८/२०१९-२०, दि.१३.०३.२०२०
४) वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, तडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. कक्ष-२/आस्था/प्र.क्र.३९/२०१९-२०/३६०१ दि ११.०३.२०२०

प्रस्तावना -

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-एक मधील नियम १३ नुसार व नियम १५(३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण आधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

२. त्याअनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.३ येथील दि.१३.०३.२०२० रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानूसार तसेच संदर्भ क्र.४ येथील वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, तडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर यांनी त्यांच्या दि. ११.०३.२०२० रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानूसार ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्पांतर्गत येत

असलेल्या उपसंचालक (कोर) मधील परिक्षेत्र, परिमंडल व नियतक्षेत्राची पुर्नरचना करण्यात आलेले नविन वनपरिक्षेत्र अधिकारी, कोलारा व वनपरिक्षेत्र अधिकारी, कारवा या पदनामास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. तदअनुषंगाने सदरहू पदनामास "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या कार्यालयाने संदर्भ क्र.३ येथील दि.१३.०३.२०२० रोजीच्या पत्रान्वये व वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर यांनी त्यांच्या दि.११.०३.२०२० रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन खालील पदांना वित्त विभागाच्या दि.०४.०१.२००६ रोजीच्या शासन निर्णयानूसार त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्याची देयके पारीत करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे :-

| वनवृत्त कार्यालय | आहरण व संवितरण अधिकारी घोषित करावयाचे पदनाम | मुख्यालय ठिकाण | जवळचे उपकोषागार कार्यालय व सांकेतांक क्र. |
|---|---|---|---|
| चंद्रपूर वनवृत्त | वनपरिक्षेत्र अधिकारी, कोलारा | कोलारा | उपकोषागार अधिकारी, चिमुर सां. क्र.-४८१२ |
| | वनपरिक्षेत्र अधिकारी, कारवा | कारवा | उपकोषागार अधिकारी, सिंदेवाही सां. क्र.-४८०४ |

सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौ. सं. क्र.२०६/२०/को.प्र.५ दि. १७.०९.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०२०१०१२१४५०१८५५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shashikant Nandkumar Bhise

Digitally signed by Shashikant Nandkumar Bhise
DN: CN = Shashikant Nandkumar Bhise, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Revenue and Forest Department
Date: 2020.10.12 14:57:19 +05'30'

**( शशिकांत भिसे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति –**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर.

३. मुख्य वनसंरक्षक (प्रा.),चंद्रपूर.

४. महालेखापाल (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर.

(यांना विनंती करण्यात येते कि, महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १५(२) व १५ (३) नुसार उपरोक्त अधिकाऱ्यास प्राधिकृत करण्याची पुढील कार्यवाही करण्यात यावी.)

५. संचालक, लेखा व कोषागार, संचालनालय, मुंबई.

६. वरीष्ठ लेखा कोषागार अधिकारी, नागपूर / मुंबई.

७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.

८. उप कोषागार अधिकारी, चिमुर, सिंदेवाही

९. सहसंचालक, (तांत्रिक) लेखा व कोषागार, मुंबई.

१०. वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.

११. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.